# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय, क्रमांक टीआरअे-११८०/सीआर ३१८/एस्‌ओआर्‌-५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ९ सप्टेंबर, १९८०.

पहा.—शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरअे ११६३/२७२६/पांच, दिनांक २३ ऑक्टोबर १९६३.
शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरअे ११६५/अठरा, दिनांक ६ मे १९६८.
शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरअे ११७५/सी-२२२/एसईआर-१०, दिनांक २२ डिसेंबर १९७५.
शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरअे ११७६/सी-८६७/एसईआर-५, दिनांक ८ डिसेंबर १९७६.

**शासन निर्णय.**—शासन निर्णय दिनांक २३ ऑक्टोबर १९६३ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांना स्वग्रामी जाण्यासाठीच्या प्रवास सवलतीची योजना प्रथम सुरू करण्यात आली. सदर योजनेनुसार कर्मचाऱ्यांस मुख्यालयापासून सुरुवातीच्या २५०/१६० (चतुर्थ श्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत) किलोमीटर प्रवासाचा खर्च जाता-येता दोन्ही वेळी स्वतःच सोसावा लागतो व शासनातर्फे त्यापुढील प्रवासासाठी व जास्तीतजास्त राज्यसीमेपलिकडे चारशे किलोमीटर पर्यंतच्या प्रवास-भाड्याच्या केवळ ७५ टक्के अर्थसहाय्य लाभते. शिवाय ह्या सवलतीचा लाभ घेण्यासाठी कमीतकमी १५ दिवसांची रजाही घ्यावी लागते. ह्या सर्व निर्बंधामुळे योजनेचा लाभ सर्वच कर्मचाऱ्यांना न मिळता तो मर्यादित प्रमाणात, अल्पसंख्य कर्मचाऱ्यांना मिळतो. मध्यंतरीच्या काळात केंद्र शासनानेही आपल्या प्रवास सवलतीच्या योजनेत सुधारणा करून, दर ४ वर्षांतून एकदा देशात कुठेही प्रवास करण्याची सवलत आपल्या कर्मचाऱ्यांना दिली. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सध्या मिळणाऱ्या सवलतीत काही सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाचे विचाराधीन होता. ह्या संदर्भात केंद्र शासनाची तसेच इतर राज्य शासनाच्या प्रवाससवलतीची योजना व शासनाची आर्थिक परिस्थिती वगैरे बाबी विचारात घेऊन शासनाने सध्याच्या प्रवास सवलत योजनेत काही प्रमाणात सुधारणा करण्याचे ठरविले असून, त्यात खालील प्रमाणे फेरबदल करण्याचा शासन आदेश देत आहे :—

(१) कर्मचाऱ्याने मुख्यालयापासूनच्या सुरुवातीच्या २५०/१६० किलोमीटर प्रवासाचा खर्च स्वतः सोसावा ही अट काढून टाकण्यात यावी व शासकीय आर्थिक सहाय्याची मर्यादा ७५ टक्के वरून १०० टक्के करण्यात यावी. म्हणजेच शासकीय कर्मचाऱ्यांना स्वग्रामी जाण्यासाठी राज्यसीमेपलिकडे ४०० किलोमीटर अंतरापर्यंतच्या प्रवासासाठी संपूर्ण प्रवासभाड्याइतके शासकीय अर्थसहाय्य उपलब्ध होईल.

(२) प्रवास सवलतीचा उपभोग घेण्यासाठी कमीतकमी १५ दिवसांची रजा घेतली पाहिजे ही अट काढून टाकली आहे. म्हणजे कर्मचाऱ्यांना थोडक्या रजेत अथवा लागून आलेल्या सार्वजनिक सुट्ट्यामध्ये स्वग्रामी जाऊन आल्यास वरीलप्रमाणे प्रवास सवलत मिळू शकेल. यासाठी संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांस प्रवास सवलत उपभोगण्याचा उद्देश पूर्व सूचित करणे मात्र पूर्वीप्रमाणेच आवश्यक राहील.

(३) ह्या योजनेखालील प्रवास सवलतीसाठी कुटुंबियात फक्त पती/पत्नी व अवलंबी मुले यांचाच समावेश आहे. ही सवलत कर्मचाऱ्यांच्या अवलंबी माता/पिता, भाऊ अगर बहिणी वगैरेंसाठी मिळू शकणार नाही.

२. ज्या कर्मचाऱ्यांची स्वग्रामे मुख्यालयापासून २५०/१६० कि.मी. अंतरापर्यंत आहेत, त्यांना दिनांक ३१ डिसेंबर १९८० पर्यंत स्वग्रामे घोषित करण्याची विशेष परवानगी देण्यात येईल. व ती त्यांची स्वग्राम घोषित करण्याची पहिली संधी समजण्यात येईल. ३१ डिसेंबर १९८० नंतर कर्मचाऱ्यांनी स्वग्राम घोषित केल्यास त्याचे शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक टीआरअे ११७५/सी-२२२-एसईआर-१०, दिनांक २२ डिसेंबर १९७५ मधील तरतुदींनुसार नियमन करण्यात यावे.

३. प्रवास सवलत पूर्वीप्रमाणे दोन वर्षांतून एकदा उपलब्ध असेल व त्यासाठी सध्या अस्तित्वात असलेले १९७९-८०, १९८१-८२ असेच, कॅलेंडर-वर्ष गट चालू राहतील. तसेच मूळ योजनेतील सीमारेषेपलिकडे ४०० कि.मी. अंतरापुढील प्रवासाचा खर्च कर्मचाऱ्याने सोसावा ही अट, अग्रीमाची सवलत, कर्मचाऱ्यांना व कुटुंबियांना स्वतंत्रपणे सवलत उपभोगता येणे, नियंत्रक अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेले याबाबतीतील अधिकार, घोषित स्वग्राम स्वीकारण्याबाबतचे निकष वगैरे अन्य तरतुदी तशाच चालू राहतील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ८ डिसेंबर १९७६ मधील आदेश, या आदेशांचे प्रमाणात सुधारीत समजण्यात यावेत.



[ उलटून पाहा

५. हे आदेश निर्गमित झालेल्या दिनांकापासून अंमलात येत आहेत.

६. ज्या कर्मचाऱ्यांनी १९७९-८० ह्या वर्षासाठीची प्रवास सवलत उपभोगली नसेल अशा कर्मचाऱ्यांना सुधारित योजनेनुसार प्रवास सवलत मिळू शकेल. ह्याबाबत शासन असाही आदेश देत आहे की, ज्या कर्मचाऱ्यांची १९७९-८० वर्षगटातील प्रवास सवलतीची देयके अद्याप आदा झाली नसतील अशी देयके सुधारित योजनेनुसार नियमित करण्यात यावीत. परंतु आदा झालेली देयके मात्र पुन्हा उघडण्यात येऊ नयेत.

७. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श्रीमती एस्. व्ही. पंडित,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (महाराष्ट्र राज्य)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्य मंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्र्यांचे व राज्य मंत्र्यांचे स्वीय सहाय्यक.
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
* वरिष्ठ उप संचालक, वाणिज्य लेखा परीक्षा, शासकीय वाहतूक लेखा परीक्षा मंडळ, मुंबई.
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
मंत्रालयाचे सर्व विभाग.
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी.
संपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती, कार्यासन एसईआर-५, वित्त विभाग.
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

*पत्राद्वारे

क्रमांक दिनांक

यांच्या माहितीसाठी व मार्गदर्शनासाठी प्रत पाठविण्यात आली आहे.